**वि.जा.भ.ज.च्या बंद असलेल्या आश्रमशाळा अन्य संस्थांकडे हस्तांतरण व स्थलांतरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक - विभशा-२०११/प्र.क्र. ३७१ /विजाभज-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २ जानेवारी, २०१२

वाचा :- १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्रमांक : विभशा २००७/प्र.क्र. ९२/मावक-६, दिनांक १ ऑगस्ट, २००७
२) शासन शुध्दीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्रमांक : विभशा २०११/प्र.क्र. ४७/मावक-६, दिनांक १४ मार्च, २०११
३) संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.विजाभज/आशा/हस्तांतर /२०१०-११/२८२१ /दिनांक ८/११/२०१०

**प्रस्तावना :** - श्री स्वामी समर्थ शिक्षण संस्था,अक्कलकोट जि. सोलापूर संचलित श्री कै.सिद्रामप्पा पाटील माध्यमिक आश्रमशाळा,कडबगाव, ता.अक्कलकोट, जि. सोलापूर या आश्रमशाळेची दि. १८.१०.२०१० च्या शासन आदेशान्वये शासनाने मान्यता रदद केलेली आहे. काही स्वंयसेवी संस्थांनी महाराष्ट्रातील बंद असलेली कोणतीही आश्रमशाळा मिळणेबाबत वेळोवेळी शासनाकडे विनंती केली आहे. त्या अनुषंगाने संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनाकडे तपासणी करून प्रस्ताव वेळोवेळी सादर केलेले आहेत.वेळोवेळी प्राप्त झालेले प्रस्ताव व शासन निर्णय दिनांक १.८.२००७ च्या तरतूदीनुसार बंद वि.जा.भ.ज. आश्रमशाळा अन्य संस्थेंस हस्तांतरण व स्थलांतरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- श्री स्वामी समर्थ शिक्षण संस्था,अक्कलकोट जि. सोलापूर संचलित श्री कै.सिद्रामप्पा पाटील माध्यमिक आश्रमशाळा,कडबगाव, ता.अक्कलकोट, जि. सोलापूर ही बंद असलेली आश्रमशाळा शिक्षण सुधार समिती,चालबर्डी,ता.केळापूर जि.यवतमाळ या संस्थेस हस्तांतरीत करून ती विजाभज आश्रमशाळा,उमरीरोड,ता.केळापूर जि.यवतमाळ येथे स्थलांतरीत करण्यास शासन खालील अटीच्या अधीन राहून मान्यता देत आहे.

१) बंद असलेल्या आश्रमशाळेतील सध्या कार्यरत असलेल्या मान्यताप्राप्त शिक्षक/शिक्षकेतर कर्मचा-यांना सामावून घेण्यात यावे.

२) बंद असलेल्या आश्रमशाळेतील निवासी विद्यार्थी या नवीन संस्थेकडे वर्ग करण्यात यावेत.
३) आश्रमशाळेबाबत शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले/होणारे आदेश, नियम व अटी संस्थेस बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक साकेतांक २०१२०१०२१६०४२३१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
**( कृ.त्रिं.कदम )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक,विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता),मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता),नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ/सोलापूर
प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण विभाग,अमरावती/पुणे
सहायक आयुक्त, समाजकल्याण, यवतमाळ/सोलापूर
अध्यक्ष/ सचिव,शिक्षण सुधार समिती,चालबर्डी,ता.केळापूर जि.यवतमाळ
मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव
निवड नस्ती, का - विजाभज-२